पालघर या नवनिर्मित जिल्हयासाठी नगर पालिका प्रशासनांतर्गत पदनिर्मिती करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमसीओ २०१४/प्र.क्र. ११४/नवि १४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १० जुन, २०१५

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांक, महसूल व वन विभाग, क्र. प्राफेब ११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दि. ३१.०७.२०१४

२) शासन आदेश क्र. जीईएन १००५/४९१/प्र.क्र.१५२/०५/नवि-१४, दि. १० ऑक्टोंबर, २०१३

**प्रस्तावना :-**

शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्र. प्राफेब-११०८/प्र.क्र. १६७/ठाणे/म-१०, दि. ३१.०७.२०१४ अन्वये ठाणे जिल्हयाचे विभाजन करून दिनांक ०१.०८.२०१४ पासून पालघर, वसई, डहाणू, तलासरी, जव्हार, वाडा, मोखाडा आणि विक्रमगड या तालुक्यांचा समावेश करून नवनिर्मित पालघर जिल्हा निर्माण करण्यात आला असून त्याचे मुख्यालय पालघर येथे ठेवण्यात आले आहे.

राज्यातील प्रत्येक जिल्हयासाठी जिल्हाधिकारी कार्यालयात, नगरपालिका प्रशासन संचालनालयांअंतर्गत संदर्भ क्र. २ अन्वये पदसंख्या निश्चित करण्यात आली आहे. या निश्चित केलेल्या आकृतीबंधानुसार पालघर या नवनिर्मित जिल्हयासाठी पदनिर्मितीचा प्रस्ताव तयार करण्यात आलेला आहे. त्यानुसार पदनिर्मिती संदर्भात शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पालघर या नवनिर्मित जिल्हयासाठी जिल्हाधिकारी कार्यालयात, नगर परिषद प्रशासन संचालनालय अंतर्गत पदनिर्मिती करावयाच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, उच्च स्तरीय सचिव समितीने दि. २० एप्रिल, २०१५ रोजीच्या बैठकीत २ पदे निर्माण करण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन दि. ०१.०७.२०१५ पासून खालील प्रमाणे नवीन पदे निर्माण करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | पदनाम | संवर्ग | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | जिल्हा प्रशासन अधिकारी | श्रेणी-२ | ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४४०० | १ |
| २ | लिपिक टंकलेखक | वर्ग-३ | ५२००-२०२०० ग्रेड वेतन १९०० | १ |
| | एकुण पदे | | | २ |

**०२.** जिल्हा प्रशासन अधिकारी, नगर विकास शाखा हे पद मुख्याधिकारी संवर्गातून भरण्यात येईल.

**०३.** उक्त नमुद केलेल्या पदांवरील वेतन व भत्यांचा खर्च मागणी क्र. एफ-२, २२१७, नगर विकास ८०, सर्वसाधारण, ००१ संचालक व प्रशासन, (००) (०१) संचालक, नगरपालिका प्रशासन (२२१७००४७) या लेखाशिर्षातुन भागविण्यात यावा.

**०४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र. पदनि-२०१५/प्र.क्र.२१/१५/वित्तीय सुधारणा-१, दि. २०.०५.२०१५ , नुसार अनौपचारिक संदर्भ क्र. ३६४/विसु-१, दि. २०.१०.२०१४ आणि वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. ५५१/व्यय-३, दि. ०४.१०.२०१४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१०१५३८५१११२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2015.06.10 15:41:06 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**उप सचिव**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगर परिष्ज्ञद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
२. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, कोकण विभाग, कोकण भवन, सिबीडी बेलापूर, नवी मुंबई
३. जिल्हाधिकारी, पालघर
४. महालेखापाल महाराष्ट्र -१, मुंबई
५. निवासी लेखाधिकारी, मुंबई
६. वित्त विभाग (व्यय-३)/ वित्तीय सुधारणा-१ मंत्रालय, मुंबई
७. निवडनस्ती (नवि-१४)